राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर अतुलनीय कामगिरी केलेल्या वयोवृध्द खेळाडूंना मानधन देण्याकरिता निधी वितरित करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांक : निविप्र ४०१८/प्र.क्र ९९/क्रीयुसे -२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : ३१ जुलै, २०१८.

**वाचा-**

१. शासन निर्णय समाजकल्याण सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्रमांक - सेनिवे -१०९१ / प्र.क्र.८२/क्रीयुसे -१,दिनांक १० जून, १९९३.
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक क्रीडायो २०१२/प्र. क्र.६४/१२ /क्रीयुसे-२, दि. २१ डिसेंबर, २०१२
३. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं - २०१८ / प्र.क्र ६९ / अर्थसं-३, दि.०२.०४.२०१६.
४. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,पुणे यांचे पत्र क्र. वयोखेमानधन/निधी वितरण प्रस्ताव/२०१८-१९/का-६/२२२९ दि.२०.०६.२०१८.

**प्रस्तावना -**

राज्य / राष्ट्रीय / आंतरराराष्ट्रीय स्तरावर अतुलनीय कामगिरी केलेल्या वयोवृध्द खेळाडूंना मानधन देण्याची योजना दि.१० जून, १९९३ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित करण्यात आली आहे. उपरोक्त संदर्भ क्र.०२ च्या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय / आंतरराराष्ट्रीय स्तरावर अतुलनीय कामगिरी केलेल्या वयोवृध्द खेळाडूंना तसेच किताब प्राप्त कुस्तीगिरांना सुधारित मासिक मानधन देण्यात येते.

उपरोक्त संदर्भाधीन क्र.०४ च्या पत्रान्वये सन २०१८-१९ या वर्षामध्ये वयोवृध्द खेळाडूंना मानधन अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता. यानुसार तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. ०३ च्या परिपत्रकाच्या अनुषंगाने राज्य / राष्ट्रीय / आंतरराराष्ट्रीय स्तरावर अतुलनीय कामगिरी केलेल्या वयोवृध्द १२५ खेळाडूंना मानधन देण्यासाठी सन २०१८-१९ मध्ये अर्थसंकल्पित निधी पैकी ७० टक्के निधी वितरणास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ या वर्षाकरीता राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर उल्लेखनीय कामगिरी केलेल्या नामवंत खेळाडूंना मानधन देण्याकरिता रु.५७.४२लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित आहे. त्यापैकी रु.४०,१९,४००/- (रुपये चाळीस लाख एकोणावीस हजार चारशे फक्त) इतका निधी वितरित करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च “मागणी क्र.ई-३, २२०४-क्रीडा व युवक सेवा-१०४ क्रीडा व खेळ (०८)(०२) राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर उल्लेखनीय कामगिरी केलेल्या नामवंत खेळाडूना मानधन (२२०४

१६५८), ३१ सहायक अनुदाने वेतनेतर" या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर योजनेअंतर्गत वयोवृध्द खेळाडूंना मानधन मंजूर करतांना संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयामधील मधील अटी व शर्ती लागू राहतील.

४. वित्त विभाग दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधीत जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र.१, २, ३, ४, ५, ६ व ७ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७३११०४६१८४४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca28 0267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.07.31 10:47:05 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.मा.राज्यपाल तथा अध्यक्ष, आंतरविद्यापीठ क्रीडा महोत्सव आयोजन समिती, मुंबई.

२.मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३.मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
४. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
५. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
६. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
८. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)
११. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१२. लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे, (क्रीडा संचालनालयामार्फत)
१३. सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत),
१४. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१५. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. निवड नस्ती (क्रीयुसे-२).